**व्यसनमुक्ती धोरणाची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी क्षेत्रात मौलिक काम करीत असलेल्या व्यक्तींना व संस्थांना सन्मानित करण्यासाठी राष्ट्रपिता महात्मा गांधी राज्यस्तरीय व्यसनमुक्ती सेवा पुरस्कार योजनेबाबत दि.१३ डिसेंबर, २०१८ शासन निर्णय रद्द करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : डीडीपी-२०१८/प्र.क्र.३१२/सामासू**
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २० सप्टेंबर, २०१९

<u>वाचा</u> - १) शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. डीडीपी-२००९/प्र.क्र.१४९ /सुधार-१ दि. १७ ऑगस्ट २०११
२) शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. डीडीपी-२०१२/प्र.क्र.५० /सामासू दि. १६ ऑगस्ट २०१२
३) शासन निर्णय,क्रमांक डीडीपी-२०१२/प्र.क्र.५७७/सामासु दि.२९ मार्च,२०१३
४) शासन शुध्दीपत्रक,क्रमांक डीडीपी-२०१२/प्र.क्र.५७७/सामासु दि.०२मे,२०१३
५) शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक डीडीपी-२०१८/प्र.क्र. ३१२ /सामासू,दि.१३ डिसेंबर,२०१८

**<u>शासन निर्णय :</u>**

व्यसनमुक्ती केंद्राना अर्थसहाय्य करणारी महात्मा गांधी व्यसनमुक्ती सल्ला,उपचार व पुनर्वसन केंद्र या योजनेनुसार प्रचलीत धोरणानुसार प्रत्येक महसूल विभागातून २ संस्थांना अर्थसहाय्य देण्याऐवजी प्रत्येक जिल्हयातून ३ संस्थांना प्रत्येकी रु. ५,००,०००/-(अक्षरी रु.पाच लाख फक्त) याप्रमाणे अर्थसहाय्य देण्याची योजना राबविण्याबाबत निर्गमित करण्यात आलेला संदर्भ क्र.५ येथील दि.१३ डिसेंबर,२०१८चा शासन निर्णय प्रशासकीय कारणास्तव रद्द करण्यात येत आहे.

२. तरी दि.१३ डिसेंबर,२०१८ च्या शासन निर्णयानुसार व्यसनमुक्ती केंद्रांना अर्थसहाय्य या योजनेकरीता दि.१३ जुलै,२०१९ च्या वर्तमानपत्रात देण्यात आलेल्या जाहिराती रद्द करण्यात येत आहे.

३. तसेच संदर्भ क्र.३ येथील दि. २९ मार्च,२०१३ च्या शासन निर्णयाप्रमाणे महात्मा गांधी राज्यस्तरीय व्यसनमुक्ती सेवा पुरस्कारासाठी प्रचलित धोरणानुसार प्रत्येक महसूल विभागातून २ प्रमाणे एकूण १२ संस्थांना प्रत्येकी रु. ११,००,०००/-( अक्षरी रु. अकरा लाख फक्त ) याप्रमाणे संस्थांना अर्थसहाय्य देण्याची योजना आहे. त्यानुसार व्यसनमुक्ती केंद्रांना अर्थसहाय्य या योजनेतंर्गत जाहिरात पुन:श्च देण्यात यावी.

४. याकरीता आयुक्त,समाजकल्याण,पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदरहू योजनेबाबतचा खर्च सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या मागणी क्र. एन-३, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२, समाजकल्याण-१०५, दारुबंदी, (०२) स्वयंसेवी संघटनांना सहाय्य, (०२) (०१) व्यसनाधीन व्यक्तिंसाठी अंमली पदार्थ सेवन विरोधी मोहीम चालविणे, त्यांच्यावर उपचार करणे, व्यसनाधीन व्यक्तिंचे पुनर्वसन करणे याकरिता स्वयंसेवी संघटनांना वित्तीय सहाय्य, (२२३५ १७५५) ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) अंतर्गत करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीमधून भागविण्यात येईल.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१९०९३०१६४५१५९८२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

SIDDHARTH
AMRUTRAO ZALTE

Digitally signed by SIDDHARTH AMRUTRAO ZALTE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=dc54b49c6f5c903027053476b3a6ef50b46ff44a7e8b820fef7bfdd100c56194, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=8ea004ae581d6ff06989d826800ff7528b6fd6418579108c011ae21079e9e0c9, ou=SOCIAL JUSTICE AND SPL ASSISTANCE DEPT,
o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SIDDHARTH AMRUTRAO ZALTE
Date: 2019.09.30 16:46:52 +05'30'

**( सिध्दार्थ अ. झाल्टे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुंबई
३. आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे.
४. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. मुख्य सचिव यांचे सह सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
७. सर्व अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
८. वित्त विभाग (व्यय-१४) , मंत्रालय, मुंबई.
९. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य पुणे.
१०. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा परीक्षा) (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
११. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१२. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१३. सर्व विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय.
१४. सर्व जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय.
१५. सर्व जिल्हा कोषगार अधिकारी
१६. सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग
१७. सर्व सहायक आयुक्त, समाज कल्याण विभाग.
१८. निवड नस्ती, सामासु.